**शासकिय आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांचे मृत्यु रोखण्यासाठी उपाययोजना सुचविण्यासाठी गठित केलेली डॉ. सुभाष साळुंखे समितीच्या शिफारशींच्या क्षेत्रीय स्तरावरील अंमलबजावणींच्या संनियंत्रणासाठी समिती गठित ठेवणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : शाआशा-२०१६/प्र.क्र.४४६/का.१३**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १० जानेवारी, २०१६.

वाचा : आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. शाआशा २०१६/प्र.क्र.१२५/का.१३, दि.३०.०५.२०१६.

**प्रस्तावना :**

आदिवासी विकास विभागांतर्गतच्या शासकिय व अनुदानित आश्रमशाळांमधील विद्यार्थ्यांचे सर्पदंश, आजारपण, अपघात, पाण्यात बुडणे, आकस्मिक व इतर अन्य कारणांनी मोठया प्रमाणावर मृत्यु होत आहेत. यासंदर्भात संसद व विधानमंडळामध्ये वेळोवेळी विविध माध्यमातून चर्चा उपस्थित करण्यात येतात. वर्तमानपत्र व वृत्त वाहिनीवरही यासंदर्भात बातम्या प्रसिध्द झाल्या आहेत. तसेच श्री.रविन्द्र तळपे यांनी मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे जनहित याचिका दाखल केलेली आहे. शासकीय आश्रमशाळांमधील विद्यार्थ्यांच्या मृत्युंची कारणे व ती रोखण्यासाठी करावयाच्या उपाययोजना करण्यासंदर्भात संदर्भाधीन दि.३०.५.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये डॉ. सुभाष साळुके यांच्या अध्यक्षतेखाली तांत्रिक समिती गठित करण्यात आली होती. सदर समितीने आश्रमशाळांना प्रत्यक्ष भेट देऊन अभ्यास करून आपला अहवाल शासनास सादर केलेला आहे. सदर अहवालातील शिफारशीवर शासनाने दिलेल्या सुचनांनुसार क्षेत्रीय अधिका-यानी केलेल्या कार्यवाहीच्या संनियंत्रण व मार्गदर्शनासाठी संदर्भाधीन समिती यापुढेही कार्यरत ठेवण्यासाठी आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

१. आदिवासी विकास विभागांतर्गत शासकिय व अनुदानित आश्रमशाळांतील विद्यार्थ्यांचे होणारे मृत्यु रोखण्यासाठी डॉ. सुभाष साळुंके समितीने केलेल्या शिफारशींवर शासनाने दिलेल्या सुचनांनुसार सर्व संबंधीत क्षेत्रीय अधिका-यानी केलेल्या कार्यवाहीचे संनियंत्रण करून त्याबाबत शासनास मार्गदर्शन करण्यासाठी संदर्भाधीन शासन निर्णयान्वये स्थापन केलेली समिती काही सुधारणांसह यापुढेही कार्यरत ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे. याशिवाय समितीस आवश्यकता वाटल्यास त्याप्रमाणे अन्य व्यक्तींना/संस्थाना याकामी निमंत्रित सदस्य म्हणून आमंत्रित करता येईल.

**समितीची रचना :-**

| अ.क्र. | नाव | पदनाम |
|---|---|---|
| १ | डॉ.सुभाष साळुंखे, सेवानिवृत्त,महासंचालक, आरोग्य सेवा, महाराष्ट्र राज्य व Asst. Regional Director, SEARO, WHO, Senior Advisor PHFI | अध्यक्ष |
| २ | संचालक, आरोग्य सेवा, महाराष्ट्र राज्य | सदस्य |
| ३ | डॉ. मधुसुदन कर्नाटकी, माजी सहसंचालक, आरोग्य सेवा | सदस्य |
| ४ | डॉ. अशोक बेलखोडे, साने गुरुजी रुग्णालय, किनवट, जि. नांदेड | सदस्य |
| ५ | डॉ. श्याम अष्टेकर, माजी प्राध्यापक व संचालक, स्कुल ऑफ हेल्थ सायन्सेस, यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापीठ, नाशिक | सदस्य |
| ६ | डॉ. आशिष सातव, महान संघटना, धारणी, अमरावती | सदस्य |
| ७ | श्रीम.हेमलता बिडकर, डांग सेवा मंडळ, नाशिक | सदस्य |
| ८ | ॲड. पूर्णिमा उपाध्याय, खोज स्वयंसेवी संस्था,अमरावती. | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ९ | डॉ. प्रियदर्शन तुरे, महात्मा गांधी इन्स्टिटयुट ऑफ मेडिकल सायन्सेस, सेवाग्राम, वर्धा | सदस्य |
| १० | अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/अमरावती | सदस्य |
| ११ | सहआयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक | सदस्य सचिव |

**२. समितीचा उद्देश व कार्यकक्षा :-**

१) आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांचे मृत्यु रोखण्यासाठी समितीने केलेल्या शिफारशींवर शासनाने दिलेल्या आदेशानांनुसार सर्व संबंधीत क्षेत्रीय अधिकाऱ्यांनी केलेल्या उपाय योजनांवर संनियंत्रण करून परिस्थितीनुरूप करावयाच्या उपाययोजना संदर्भात शासनास मार्गदर्शन करणे.

२) आश्रमशाळेत यापुढे विद्यार्थ्यांचे होणारे मृत्यु व त्यांच्या कारणाचे विश्लेषण करून उपाययोजना सुचविणे.

३) आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांचे मृत्यु रोखण्यासाठी करण्यात येत असलेल्या उपचारात्मक कार्यपध्दतीबाबत शासनास मार्गदर्शक करणे.

४) आश्रमशाळेतील शिक्षक व विद्यार्थ्यांकरिता राबविण्यात येत असलेल्या प्रशिक्षण कार्यक्रमांचे विश्लेषण करणे.

५) बाल हक्क संरक्षण धोरणाच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी संनियंत्रण करणे व उपाय सुचविणे.

**३. अशासकीय सदस्यांना बैठक भत्ता :-**

सदर समितीचे सदस्य सार्वजनिक हितार्थ विना-मानधन कार्य करणार आहेत. तथापि, समितीच्या वेळोवेळी होणाऱ्या बैठकांना उपस्थित राहण्यास्तव अशासकीय सदस्यांना प्रत्येक बैठकीसाठी रू.२५००/- भत्ता देय राहील. तसेच क्षेत्रीय भेंटीसाठी प्रतीदिन प्रमाणे भत्ता देणेत येईल.

**४. बैठकांचे आयोजन व समन्वय :**

उपरोक्त समितीच्या बैठकांची व क्षेत्रिय भेटींसाठीची व्यवस्था आदिवासी विकास आयुक्तालयाकडून करण्यात येईल व त्याबाबत समन्वय साधण्यात येईल.

**५. तरतुद व खर्च :**

भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५ (१) अंतर्गत अनुदान या केंद्रीय योजनेतून मुल्यमापन व संनियंत्रण या योजनेसाठी प्राप्त निधीतून सदर समितीच्या बैठकांचे आयोजन व अशासकीय सदस्यांच्या बैठक भत्याचा खर्च करण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१७०११११५५६०५६४२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2017.01.11 15:59:50 +05'30'

**( सु. ना. शिंदे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई:- ४०० ०३२
३. मा.मुख्यसचिव, महाराष्ट्र राज्य,मंत्रालय, मुंबई:- ४०० ०३२

४. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. मा. मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
६. मा. मंत्री, सार्वजनिक आरोग्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
७. मा. मंत्री, पाणीपुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
८. मा. मंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
९. मा. मंत्री, अन्न व नागरी पुरवठा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१०. मा.मंत्री, ग्रामविकास व जलसंधारण विभाग
११. प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई:- ४०० ०३२
१२. प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई:- ४०० ०३२
१३. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई:- ४०० ०३२
१४. प्रधान सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई:- ४०० ०३२
१५. प्रधान सचिव, अन्न व नागरी पुरवठा विभाग, मंत्रालय, मुंबई:- ४०० ०३२
१६. सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई:- ४०० ०३२.
१७. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई:- ४०० ०३२.
१८. सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई:- ०३२.
१९. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई:- ४०० ०३२
२०. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
२१. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२२. आयुक्त, बाल कल्याण, महाराष्ट्र राज्य, कोकण भवन ,नवि मुंबई.
२३. अप्पर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे / नाशिक / अमरावती / नागपूर.
२४. सर्व जिल्हाधिकारी
२५. सर्व जिल्हा पोलीस अधिक्षक
२६. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
२७. सर्व कार्यकारी अभियंता,पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग
२८. सर्व कार्यकारी अभियंता,महाराष्ट्र जिवन प्राधिकरण
२९. सर्व जिल्हा शल्य चिकित्सक
३०. सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी
३१. सर्व जिल्हा हिवताप अधिकारी
३२. सर्व जिल्हा शिक्षणाधिकारी (माध्यमिक)
३३. सर्व जिल्हा शिक्षणाधिकारी (प्राथमिक )
३४. सर्व उप मुख्य कार्यकारी अधिकारी ( महिला व बाल विकास ), जिल्हा परिषद.
३५. सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी,
३६. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
३७. महालेखापाल (लेखा परिक्षा), / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मंबई .
३८. महालेखापाल (लेखा परिक्षा), / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- २, नागपूर.
३९. सर्व सह सचिव / उप सचिव/अवर सचिव / कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
४०. निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.